# अनुक्रमणिका





" स्वातंत्र्याची ध्वजा फडकते सूर्य तळपतो प्रगतीचा

भारतभूमीच्या पराक्रमाला मुजरा महाराष्ट्राचा "

स्वातंत्र्य भारताला आज ६८ वर्ष पुरण होत आहे . तरीही आजकाल एकमेकांशी खेळे जाणार राजकारण आणि राजकीय पातळी वरील राजकारण , भ्रष्टाचार या सगळ्या मध्ये खरोखरच आपण या थोरवीरांचे कर्तुत्व विसरत चलो आहोत. तरी या गोष्टी आपल्या परीने सुधारण्यासाठी चांगला सहभाग देऊन ,सुधारण्याचा प्रयत्न करून स्वातंत्र्य लढयातील शूरवीरांना मानवंदना देऊ .

या महिन्यात बच्चेकंपनीला सुट्टी असल्याने काहीजण सुट्टीचा आनंद लुटायला मामाच्या गावाला आहेत. काही जण सहलीचा आनंद घेत आहेत. या कारणाने आम्हास लेख कमी आले आहेत. तरी वेळात वेळ काढून ज्या सदस्यांनी लेख पाठवले त्यांचे आभार .पुढील महिन्याच्या बहर मध्ये आपल्या लेखांची जास्तीत जास्त भर पडेल अशी आशा बाळगते. आपले अभिप्राय आम्हाला कळवा.

**पुढील महिन्याचा विषय - ' आठवणीतील गणपती उत्सव '**

सौ. राधिका लपालीकर.

निहाल मांडके.

सौ. कोमल तावडे.

( बहर टीम २०१४ - २०१५ )



# " स्वातंत्रदिन - माझ्या मनातील भवना"

सानेगुरुजींनी वैभवशाली भारताचे स्वप्न पहिले हेच स्वप्न त्यांनी शब्दात गुंफले आणि सूर उमटले .... 'बल सागर भारत होवो , विश्वात शोभूनी राहो ' भारताला बलशाली करण्यासाठी गरज आहे ती प्रखर राष्ट्रनिष्ठेची .
एखाद्या परकीय देशाविरुद्ध भारतीय क्रिकेट टीमने विजय संपादन केला तर आपण केवढा जल्लोष करतो, फटाके उडवून आपला आनंद धुमधडाक्यात साजरा करतो. एका दिवसभराच्या पराक्रमाने आपण एवढे भारावून जातो मग ज्यांनी आपल्यावर दीडशे वर्षे राज्य केले, पिढ्यानपिढ्या आपली मुस्कटदाबी केली, त्यांना नमविल्याचा अन स्वातंत्र्यप्राप्तीचा आनंद १५ ऑगस्ट १९४७ ला किती उत्साहात साजरा झाला असेल ? नुसत्या कल्पनेन देखील अंगावर रोमांचं उभे राहतात .

शूरांची, वीरांची, संत-महंत, शास्त्रांन्याची गौरवशाली परंपरा लाभलेला माझा भारत देश. अशा या देशाच्या स्वातंत्र्याचा सुवर्णमहोत्सव पाहण्याचे सोनेरी सदभाग्य आपल्या वाट्याला आले. आजही आपण अत्यंत अभिमानाने स्वातंत्र्यलढ्याचा हा विजयदिन साजरा करतो. परंतु हा अभिमान, उत्साह निव्वळ या स्वातंत्रदिनापुरताच मर्यादित आहे का ? शांतपणे विचार करता ह्या प्रश्नाचे एक उत्तर 'समाज्याच्या मनोवस्थेत ' दडलेले आढळून येईल. खरतर अन्यायाविरुद्ध लढण्यासाठी दोन बलदंड हाताइतकीच प्रबळ इच्छाशक्तीची पण गरज असते. पारतंत्र्यात निराशेच्या गर्तेत सापडलेल्या देशवासियांच्या मनातील सुप्तावस्थेत असलेले देशप्रेम जागविण्याचे कार्य लो.टिळक, म.गांधी, स्वा.सावरकर, भगतसिंग, बाबू गेनू , नेताजी सुभाषचंद्र बोस यांसारख्या



देशभक्तांनी केले. त्यांच्या त्यागातून, शौर्यातून भारतीय स्वातंत्र्याचा इतिहास निर्माण झाला. हा इतिहास आमच्या जाज्वल्य अस्मितेचा आहे, एकतेचा आहे, राष्ट्रानिष्ठेचा आहे. आपल्या कडे स्वातंत्र्यलढ्याचा इतिहास शिकवला जातो पण बिंबवला जात नाही. इतिहासाच्या पानावरचे राष्ट्रप्रेम मुलांच्या मनावर प्रामाणिकपणे बिंबवले गेले तरच देशभक्ताचे नवे वारसदार निर्माण होतील. अन त्यांची लढाई जे गैर, भ्रष्ट आहे त्याविरुदध असेल.

संयुक्त राष्ट्राच्या development programme अतशर्त जाहिर करण्यात आलेल्या human development Index ( H D I ) मध्ये भारत पिछाडीवर आहे. देशातील आर्थिक उत्पन्न, शिक्षण व आरोग्य ह्या निकषांवर हा H D I आधारित आहे. ह्या Index ची किमान मर्यादा १.० असताना, भारताचा H D I  फक्त ०.५८६ इतकाच आहे. ह्या यादीत भारताचा १३५ वा क्रमांक आहे.यावरून असे दिसते की आरोग्य, शिक्षण तसेच सामाजिक सुरक्षितता या बाबींवर लक्ष देणे अधिक गरजेचे आहे.

आजकाल माणूस आत्मकेंद्री बनला आहे. ' मी, माझे घर, माझे कुटुंब ' ह्या चौकटीत रमला आहे. स्वराज्याचे सुराज्य झाले नाही हा खेद बाळगण्यापेक्षा व्यक्तीगत भलाईच्या विवंचनेत तो गुंतला आहे. कारण देशप्रेमाची, त्यागाची, अस्मितेची भावना पुरेशा प्रमाणात संस्कारीत झाली नाही. अशी एक भावना दृढ झाली आहे की, राष्ट्राचे भले करायचे ते सत्तेवरील मंडळींनी आणि आपण मात्र त्यांना जाब विचारायचा अथवा त्यांच्या नावाने बोटे मोडायची. जपान, सिंगापूरच्या प्रगतीची, स्वचातेची, वैभवाची प्रशंसा अन आपल्या देशातील दारिद्र्य, अज्ञान, घाण या कडे दुर्लक्ष करायचे. आपण मात्र हे लक्षात घेत नाही की जपान



वा सिंगापूर, तिथे प्रत्येकाने स्वयंशिस्त जोपासलेले असते. त्यांची कर्मनिष्टा थोर असते, राष्ट्रप्रेमाची भावना प्रबळ असते. मला वाटते की आपला स्वातंत्र्यदिन हा या भावना वृद्धीचा संकल्पदिवस असावा.

आज सार्वजनिक जीवनात बेशिस्त आणि आर्थिक व्यवहारात भ्रष्टाचार वाढला आहे. चंगळवादी वृत्ती फोफावली आहे. कमी श्रमात भरपूर पैसा मिळविण्याची लालसा वाढली आहे. अवतीभोवतीचा हिंसाचार भ्रश्ताचार चीड येण्याऐवजी तो मख्खपणे पचविण्याची वृत्ती वाढली आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर, महात्मा फुले, लो. टिळक, महात्मा गांधी ही आपली प्रेरणास्थाने अन आपल्या राष्ट्राची दैवते आहेत. आजही हे महापुरुष त्यांच्या विचारांच्या रूपाने चिरंजीव आहेत. केवळ जयंती अन पुण्यतिथीस त्यांना हार अर्पण करून अथवा स्वातंत्र्यदिनाला तिरंग्यास मानवंदना देऊन आपला राष्ट्रधर्म सिदध होणार नाही. बलशाली भारतासाठी सर्वांची मने आणि मनगटे यांची एकजूट व्हायला हवी. इतिहासाचे गोडवे गाऊन भागणार नाही तर त्याग व समर्पणाची भावना मनी जगविणे देखील तितकेच महत्वाचे आहे. 'माझ्या पेक्षा माझा देश मोठा ' ही सामाजिक जाणीवच राष्ट्राला उच्चस्थानावर नेऊ शकेल.

पंडीत रविंद्रनाथ टागोरांनी केलेली " जिथे चित्त निर्भय झाले आहे आणि ज्ञान मुक्त झाले आहे अश्या स्वातंत्र्याच्या स्वर्गात देवा भारताला जागृती येऊ दे." ही प्रार्थना आपण बलशाली भारताला महासत्ता बनविण्यासाठी प्रतिदिनी आळवू या.

डॉ. पल्लवी प्रसाद बारटके.



# छायाचित्रण - एक कला

## -कॅमेऱ्याची काळजी- १

आजकाल जवळपास बऱ्याच जणांकडे कॅमेरा असतोच. अगदी एस एल आर (SLR Single Lens Reflect Camera) नसला तरी पॉइंट एंड शूट वाला डिजीटल किंवा फिल्मवाला तरी नक्कीच असतो. आणि आपण त्याचा वेळोवेळी वापर करत असतो. पण त्याच्या साफ सफाई कडे किती लक्ष देतो आपण?. मग काही दिवसांनी फोटोवर ठिपके किंवा डाग दिसायला लागतात.

हे सर्व बहुतेकवेळा कॅमेरा साफ नसल्यानेच घडलेले असते. आपल्या घरातल्या फर्निचरवर जशी धूळ बसते तशीच ती कॅमेऱ्यावर पण बसते. पण कॅमेऱ्यावर आणखीही इतर गोष्टींचा परिणाम होतो. म्हणुनच छायाचित्रणाच्या इतर technical आणि मुलभुत गोष्टींची चर्चा करण्याआधी या भागात आपण आपला कॅमेरा कसा बरं नीट ठेवायचा? या बद्द्ल बोलू.

तुमचा पॉइंट एंड शूट (बघून नुसते बटन दाबायचा) कॅमेरा असेल तर काही छोट्या गोष्टी लक्षात ठेवल्यात तरी पुरे आहेत.

पण एस एल आर किंवा एस एल आर लाईक कॅमेरा असेल तर मात्र बरीच काळजी घेण आवश्यक आहे. अशी काळजी घेऊन भुताटकी नक्कीच थांबवता येईल आणि तुमचे फोटोपण चांगले येत रहातील.

कॅमेराची लेन्स ही अनेक प्रकारची भिंगं एकत्र जुळवून बनवली असते. प्रकाश नीट आणि हवा तेवढाच कॅमेरात जावा यासाठी लेन्सवर खूप केमिकल आवरणाचा मुलामा (coating) असतो. खराब वापरण्याने, कसेही पुसण्याने ते खराब होतं आणि फोटोंची प्रत खराब होते.

त्यामुळे कॅमेराची काळजी घेताना, वापरताना काही सावधानता बाळगायला हवी.**धूळ आणि** किंवा इतर केरकचरा:

कॅमेरा गळ्यात घालून फिरताना किंवा प्रत्यक्ष फोटो काढतानाही त्यावर धूळ ही



बसणारच. नको असेल त्यावेळी लेन्स कव्हर लाऊन ठेवणे. कॅमेरा कसाही कुठेही खाली न ठेवणे या गोष्टी गरजेच्या आहेत.

तरीही लेन्स च्या पुढच्या भागावर बारीक कण तंतू इत्यादी बसताच आणि ते काढणं तसं सोपं आहे. नुसत्या ब्लोअरने (हवेचा हातांना दाबता येणारा छोटा पंप) ही ती काढता येते.

पण कॅमेरात आतमध्येही बऱ्याच वेळा धूळ जाते. हे कसं कळतं तर तुमच्या फोटोमध्ये धुसर ठिपके दिसतात. डिजीटल फोटो असेल तर कॉम्पुटर स्क्रीन वर फोटो एकदम मोठा करून सगळी कडे बघितलत तर सगळ्या फोटोत ठराविक ठिकाणी हेच धुसर डाग दिसतात.

अशा वेळी कॅमेऱ्याची लेन्स काढावी. कॅमेरा मेन्यू मधे मिरर लॉक अशा प्रकारचा एक ऑप्शन असतो. त्याने मिरर लॉक करावा. (कॅमेरा मन्युअल नीट वाचले तर याची नक्की माहिती मिळेल.) मिरर लॉक केले की सेन्सर दिसतो. मग कॅमेरा उलटा करुन म्हणजे सेन्सरचा (डिजीटल कॅमेऱ्याचा) भाग जमिनी कडे करून हळुवार पणे ब्लोअरने फुंकून टाकावी. हे करताना अगदी हळुवार पणे करणे आवश्यक आहे नाहीतर सेन्सर खराब होऊ शकतो. एवढ्या एका उपायाने पण बराच फरक पडेल. **कुठ्ल्याही परिस्थितीत डिजिट्ल कॅमेऱ्याच्या सेन्सरला हात लाउ नये. ब्लोअर कॅमेऱ्याच्या अगदि आतल्या भागात पण नेऊ नये. शक्य तितका बाहेर ठेवावा. मिरर अचानक बंद झाल्यास ब्लोअरवर आपटुन मिरर खराब होइल**

ब्लोअर म्हणून एअर डस्टर जे मिळतात ते मात्र अजिबात वापरू नये. ते कॉम्प्युटर वैगेरे साठीच असतात. त्याने सेन्सर जास्त खराब होण्याचा संभव असतो.



कधी कधी लेन्स च्या पुढच्या भागावर बारीक कण तंतू चिकटून बसतात. त्या साठी मात्र कॅमेऱ्याचं क्लिनिंग लिक्विड मिळतं ते वापरावं. कॅमेऱ्याच्या क्लिनिंग किट मध्ये हे लिक्विड, एक कापड किंवा क्लिनिंग पेपर मिळतात तेच वापरावे. इतर कोणत्याही कापडाने लेन्स वर चरे, ओरखडे पडण्याची दाट शक्यता असते तर हे लिक्विड टाकून त्या कापडाने हळुवार गोलाकार हात फिरवत लेन्स पुसून काढावी. जास्त जोरात न केलेले उत्तम.

काहीवेळा जर लेन्स बऱ्याच वेळा बदलावी लागत असेल तर कधी कधी लेन्स आणि कॅमेरा जिथे जुळतात (lens mount) तिथे कचरा जमू शकतो. किवा तळहाताचे तेल, घाम त्या जोडणीच्या (joints) ठिकाणी जमू शकते.

यामुळे कॅमेरा कधीकधी लेन्स लावून सुद्धा लावलेली नाही असा संदेश देतो (lens not detected) किंवा फोटो काढता काढता कॅमेरा बंद पडू शकतो. यावर उपाय म्हणजे हात स्वच्छ करून मगच लेन्स बदलणे. आणि खूप वाऱ्याच्या, धुळीच्या ठीकाणी शक्यतो लेन्स बदलणे टाळावे.

तरीही असं झालच तर त्याच क्लिनिंग लिक्विड आणि कापडाने हे जोडणीचे भाग हळुवार साफ करावे. हे पण अगदी हळुवार करणे गरजेचे आहे. त्या भागांवर सोन्याचा मुलामा असतो तो निघाला किंवा त्यावर चरे पडले तर लेन्स कॅमेऱ्याला नीट जोडली जाणार नाही.

**फंगस अर्थात बुरशी:**

बुरशी हा सर्रास दिसणारा प्रकार आहे. मुळात बुरशी ही हवेतून येते. हवेत बुरशीची सुक्ष्म अशी बीजं तरंगत असतात. ती बीजं ओलसर ठिकाणी पडली की त्याची वाढ होते आणि बुरशी दिसायला लागते. म्हणून कॅमेरातही ती हवेतूनच येते. कॅमेरा किंवा लेन्स च्या आतल्या वाजुला आली असेल तर साफ करणे खुपच त्रासाचे असते. इंटरनेट वर बुरशी साफ करायचे बरेच उपाय सापडतीलाही पण ती माहितगार माणसाकडून किंवा सर्विस सेंटर कडून साफ करून घेणेच चांगले.



बुरशी आलीये हे कस कळतं तर कॅमेरयामध्ये किंवा लेन्स मध्ये पांढरट पिवळट तंतू सारखे काहीतरी दिसायला लागते. नीट बघितल तर त्याला अतिशय सूक्ष्म आडवे आडवे तंतू पण दिसतात. ती अगदी घट्ट काचेला किंवा लेन्सला चिकटलेली असते. फोटोत पण ठीपके किंवा डाग दिसु लागतात.. काळपट , रात्रीच्या फोटोत जाणवून येत नाही. पण दिवसाचे , निळ्या आकाशाच्या फोटोमध्ये लगेचच दिसते.

बहुतेक वेळा बुरशी आल्यावर उपाययोजना करण्यापेक्षा ती येउच नये म्हणून प्रतिबंध करणे उत्तम.

सगळ्यात सोपा आणि बिन खर्चाचा उपाय म्हणजे कॅमेरा नेहेमी वापरत असावा. खूप दिवस बंद करून ठेवलेल्या कॅमेऱ्यात बुरशी होण्याची शक्यता जास्त असते. अगदी फोटो काढायचे नसेल तरी महिन्यातून एकदा नुसताच बाहेर काढून काही क्लिक कराव्या.

बुरशी वाढते ओलाव्यावर. म्हणून कॅमेरा ठेवल्याजागी ओलसरपणा दमटपणा नसावा. कॅमेऱ्याची बॅग ओली झाल्यास चांगली वाळवून मगच वापरावी. खाण्याचे पदार्थ असलेल्या बॅगेमध्ये कॅमेरा ठेवू नये.

आर्द्रता कमी करण्यासाठी अजुनही काही उपाय करु शकतो.

कॅमेरा बंद कपाटात ठेवून ज्या कप्प्यात ठेवला असेल तिथे एक बल्ब लावून ठेवायचा. यामुळे कप्पा गरम राहातो व आर्द्रता कमी होऊ शकते.

कॅमेऱ्याच्या दुकानात एक सिलिका जेल (Silica gel) मिळते. नावात जेल म्हटल तरी ते खडे असतात. साधारणपणे निळसर झाक असलेले आणि पारदर्शक असतात. नवीन घेतलेल्या बुटात , लेदर पर्स मध्ये किंवा बऱ्याच लेदर वा प्लस्टीकच्या वस्तुंच्या बॉक्समध्ये पण याच्या चिमुकल्या पुड्या असलेल्या तुम्ही बघितल्या असणार. तेच हे सिलिका जेल.

ते कापडात पुरचुंडी बाधून या कप्प्यात ठेवायचं. हे जेल हवेतली आर्द्रता (humidity) शोषून घेतं. पाणी साठवून त्याचा रंग बदलतो आणि ते अपारदर्शक पांढरट असं होतं. असं झालं की कडक उन्हात वाळवायचं



मग परत ते पहिल्यासारखं पारदर्शक बनतं. याला जेल रिजनरेट किंवा रिस्टोर असं म्हणतात. एकदा विकत घेतलेले जेल बराच काळ रिजनरेट करत असं परत वापरता येतं. काही वेळा पांढर जेल पण मिळत. हे जेल रंग बदलत नाही पण त्याच्या वजनावरून त्याच्यात पाणी शोषलं गेलय की नाही हे समजतं. पाणी शोषलं गेल असेल तर त्याच वजन अर्थातच वाढतं. मग रिजनरेट केल्यावर वजन कमी होतं.




आणखी एक उपाय म्हणजे ओव्याची पुरचुंडी (कॅरोम सीड्स) कप्प्यात ठेवायची. ओव्यात असलेल्या कुठल्याशा द्रव्याने बुरशीची वाढ बंद होते म्हणे. पण मी हा उपाय कधी केलेला नाही. अजून पर्यंत तरी माझ्या कॅमेऱ्यात बुरशी झाली नाहीये. ज्याना बुरशीचा त्रास असेल त्यांनी करून मला नक्की सांगा काय होत ते.

बघा हे उपाय करून तुमच्या कॅमेऱ्यातल्या बुरशीला आणि धुळीला टाटा करता येतोय का!

हे झालं कॅमेरा घरात किंवा बॅगेत ठेवताना घेण्याची काळजी. पुढील भागात प्रत्यक्षात फोटो काढताना किंवा घराबाहेर असताना घेण्याच्या काळजीबद्दल बोलु.




Life is like a Camera.
Just focus on what's important
and capture the good times, develop
from the negatives and if things
don't turn out,
Just take
another
shot.
rawforbeauty.com

- अजय पडवळ.



# पुस्तक परिचय

अकरा कोटी गॅलन पाणी

लेखक : अनिल बर्वे

प्रकाशन : ऊर्जा प्रकाशन

पाने : १३४

हेपुस्तक म्हणजेदोन दीर्घकथांचा संग्रह आहे. पहिल्या कथेचेनाव आहेअकरा कोटी गॅलन पाणी व दुसर्या कथेचेनाव आहे

स्टडफार्म.

११ अकरा कोटी गॅलन पाणी

भद्रपुर भागामध्येमुबलक कोळसा उपलब्ध आहे. सेठ जमनादास मेहता "शैतानी खदान" या कुप्रसिद्ध खाणीचा मालक आहे.

या खाणी मधून कोळसा काढायला सतराशेविघ्नंआली होती आणि बरीच माणसंमेली होती. स्वामी या हुशार अभियंत्यानेया

खाणी मधुन यशस्वीरित्या कोळसा काढून दाखवला होता. कोळसा काढल्यावर त्या जागी वाळूव पाणी यांचेमिश्रण भरावेलागते

पण लोभी जमनादासच्या आदेशानेशैतानी खदानात फक्त पाणी भरलेजातेआणि सरकार कडून वाळूची सब्सिडी उकळली जाते.



खाणीतील कार्बन मोनॉक्साईड व मिथेन या वायूंमुळेअकरा कोटी गॅलन पाणी विषरी बनलेआहे. आपलेदुष्कृत्य लपवण्यासाठी

या खाणीला आग लावली जातेआणि खाणीचंतोंड बुजवून तिला कायमचेबंद केलेजाते. पाप झाकण्यासाठी खोटेनकाशेबनवुन

उत्खननाचा आकार लहान दाखवला जातो.

आता खाणींचंराष्ट्रीयकरण झालंआहे. स्वामी निवृत्त झाला आहे. शैतानी खदाना जवळच एका नविन खाणीचंउत्खनन सुरूझालं

आहे. ही नवीन खाण स्वामीनेतयार केलेल्या खोट्या नकाशांच्या आधारेखणली जात आहे. त्यामुळेचुकून नविन खाण शैतानी

खदानाला जोडली जाईल आणि अकरा कोटी गॅलन विषरी पाणी नविन खाणीत जाईल या भीतीनेस्वामीची झोप उडाली आहे. हेविषारी

पाणी जर खाणीत घुसलंतर त्यातील सर्व ४०० ते५०० जण क्षणार्धात मरणाच्या दारात लोटलेजातील. या दुर्घटनेची शक्यता

प्रत्यक्षात उतरणेजवळजवळ नक्की आहे.

स्वामी काय करणार? जर तो बोलला तर त्यालाच अटक होऊ शकते. स्वामीची सद्सद्विवेकबुद्धी त्याला स्वस्थ बसूदईल का? तो

कोणाकडेधाव घेईल? सेठ जमनादास मेहता? युनीयन वाले? राजकारणी? वृत्तपत्रं? नविन खाणीचा व्यवस्थापक? कोणी त्याच्या



हाकेला ओ देईल का? स्वामी ही भयंकर दुर्घटना थांबवूशकोल का?



स्टडफार्म

ग्यानीसेठ हा एक गर्भश्रीमंत व्यापारी आहे. त्याचेअनेक व्यवसाय आहेत परंतुत्याची खरी आवड खरी हौस आहेत्याचा

स्टडफार्म. त्याला घोड्यांचा नाद आहे. घोडेहेच त्याचेआयुष्य आहे. हा रात्रंदिवस घोड्यांचाच विचार करतो. स्वप्नातसुद्धा

त्याला घोडेच दिसतात. एरवी कामगारांना पगारवाढ देताना काचकुच करणारा ग्यानीसेठ घोड्यांवर मुक्तहस्तेखर्च करतो. त्याचा

स्टडफार्म भारतातील सर्वोत्तम समजला जायचा. कर्नाळा समुद्रकिनरी तो लहानमुलांना फेरी मारणाऱ्या घोडेवाल्याचेचांदा

नावाचे शिंगरू हेरतो. ग्यानीसेठची अनुभवी नजर भावी विजेता ओळखते. तो चांदा विकत घेतो आणि त्याचा मालक येसूघोडेवाल्याला

चांदाचा साईस म्हणून नोकरीवर ठेवतो. कुलवान नसलेल्या चांदाला विजेता बनवून ग्यानीसेठला इतिहास निर्माण करायचा असतो.

चांदाला निष्णात प्रशिक्षकाकडून शिक्षण दिलेजाते. त्याला ग्रँड गॅलॉपर हेनविन नाव दिलेजाते. चांदावर तिनजण जीवापाड

प्रेम करतात, येसूघोडेवाला ग्यानीसेठ आणि ग्यानीसेठची लहान मुलगी. चांदाचेपण तिघांवर प्रेम असते.

शर्यतींचा मौसम सुरूहोतो. पहील्या शर्यतीत चांदावर पैसेलावायला कोणीच तयार नसते. त्याला टांग्याचा घोडा म्हणून हिणवले



जाते. चांदा पहिली शर्यत फोटो फिनीश मध्येजिंकतो. कोणाचा विश्वासच बसत नाही. त्याला हिणवनार्यांची तोंडेबंद होतात.

त्यानंतर चांदा त्या मोसमतील प्रत्येक महत्वाची शर्यत जिंकतो आणि विक्रम प्रस्थपित करतो. आता शेवटची सगळ्यात मोठी

शर्यत बाकी असतेआणि बक्षिस इंग्लंडच्या राणीच्या हस्तेदिलेजाणार असते. चांदाचा विजय वादातीत असतो.

चांदाला घेऊन येणाऱ्या विमानात बिघाड होतो आणि त्याच्या एका चाकाचेटायर फुटते. विमान उतरूशकोल का? चांदा सहीसलामत

बहेर येईल का ? ग्यानीसेठला कोणाची काळजी आहे? चांदा की विमनातील त्याची माणसेकी त्याचेविमान? चांदा त्यच्या

आयुष्यातली सर्वात मोठ्या शर्यतीत धावेल का? तो शर्यत जिंकेल का? येसूघोडेवाल काय करेल?

अनिल बर्वेत्यांच्या गोष्टींमधून आणि कादंबर्यांमधुन सामजिक विषय प्रभावीपणेमांडतात. सामजिक विषय आणि कथा

यांची उत्तम सांगड घालण्याची त्यांची हातोटी आहे. या पुस्तकात त्यांनी प्रेम, द्वेश, समनुभूती, निर्दयीपणा या मानवी भावना

उत्कटरित्या आणि कथेशी तडजोड न करता दर्शविल्या आहेत. दोन्ही कथा

सुटसुटीत आणि खुसखुशीत आहेत.



वैयक्तिकरित्या मला असेवाटलेकी पहिल्या कथेत अजुन दहा पानेहवी होती. त्यामुळेलेखकाला कथेची पार्श्वभूमी आणि

परमवधी आणखी परिणामकारक करता आला असता. हेपुस्तक लहान असल्यानेजेपट्टीचेवाचक नाहीत तेसुद्धा वाचूशकतात.

उत्तम पुस्तक। जरूर वाचा।

- मंदार आपटे.



# Friendship Day History

There is not much literature on Friendship Day history as we celebrate today. However, there are

numerous folktales and several instance in mythological legends that shows that friends and friendship

have been valued since the beginning of civilized world. As an intrinsically social creature, men love to

make friends to further this process of socialization.

History of Friendship Day in US

Considering the valuable role friends play in our life it was deemed to fit to have a day dedicated to

friends and friendship. The United States Congress, in 1935, proclaimed first Sunday of August as the

National Friendship Day. Since then, celebration of National Friendship Day became an annual event.

The noble idea of honoring the beautiful relationship of friendship caught on with the people and soon

Friendship Day became a hugely popular festival.

Following the popularity and success of Friendship Day in US, several other countries adopted the

tradition of dedicating a day to friends. Today, Friendship Day is enthusiastically celebrated by several

countries across the world including India.

In 1997, the United Nations named Winnie - the Pooh as the world's Ambassador of Friendship.



Importance of Friendship in Bible

The Bible, the primary text of the western civilization, reflects upon friendship as the bond that forms

the foundation to human faith, trust and companionship. Following verses from the bible aptly portray

the importance of friends:

"Ask and it will be given to you; seek and you will find; knock and the door will be opened to you."

Matthew 7:7

“Greater love hath no man than this that a man lay down his life for his friends.”

John 15:13-15

Besides, there are several tales from the Old Testament and the New Testament about the value of

friendship and how true friendship is a treasure to unearth. A noticeable point is that, both the versions

make a difference between the two broad meanings of friendship- one is a mere acquaintance, the

other is a more affectionate relation.

In the Old Testament, Abraham is called the “friend of God” because of the intimacy of his relations.

God speaks to Moses face to face “as a man...unto his friend” (Ex 33:11). The romantic friendship of

Ruth and Naomi, the devotion of the subordinate Hushai for David, or the mutual relation between



David and Jonathan - the Old Testament is replete with these interesting tales of friends and friendship.

In the New Testament, the relationship between Jesus and his disciples clearly depicts how human

friendship can constantly grow. From being teacher and disciple, to lord and servant their relationship

finally grew to an unparalleled friendship.

Importance of Friendship in Mahabharata

In the famous Hindu epic ‘Mahabharata’, Lord Krishna demonstrates the many colors of friendship

- affection, romance, brotherhood, protection, guidance, intimacy and even teasing. Friendship is all

about these and much more.

It may be noted that some associations celebrate Friendship Day in an entirely different time of the year

and with different customs. For instance,

•National Friendship Day is on the first Sunday in August.

•Women's Friendship Day is on the third Sunday in August

•International Friendship Month is February

•Old Friends, New Friends Week is the third week of May

- ulka nandekar





नमस्कार मंडळी,

दिनांक १८ जुलै २०१४ रोजी 'महाराष्ट्र मंडळ अबु धाबी' ने आयोजित केलेली 'टेबल टेनिस' स्पर्धा अतिशय उत्साहात, खेळीमेळीने आणि यशस्वीरीत्या पार पडली. याचे महत्वाचे कारण म्हणजे आपल्या मंडळातील उत्साही आणि प्रतिभावान खेळाडूंनी एकेरी आणि दुहेरी विभागांत मिळून तब्बल ६४ नोंदण्या करून या स्पर्धेला दिलेला प्रचंड प्रतिसाद.

एकेरी विभागात ३२ आणि दुहेरी विभागातही ३२ (१६ जोड्या) स्पर्धकांनी भाग घेतला. संपूर्ण स्पर्धेत एकूण ४६ matches आणि प्रत्येक match साठी लावलेला best of three games चा निकष असे मिळून अंदाजे १२५ games खेळले गेले. स्पर्धेचा हा प्रचंड आवाका लक्षात घेता हि स्पर्धा Indian Social and Cultural Center (ISC) च्या टेबल टेनिस हॉल मध्ये खेळविण्याचा निर्णय घेण्यात आला आणि नोंदणी केलेल्या सर्वच स्पर्धकांनी उपस्थित राहून हा निर्णय सार्थ ठरवला.

विशेष उल्लेख करावा लागेल तो सौ अनुजा नेवगी, सौ प्रेरणा भागवत आणि चि. आर्य सावंत यांचा. महिला आणि मुले विभागांतील पुरेश्या नोंदणीअभावी या तिघांनी पुरुष स्पर्धकांबरोबर मुकाबला करताना दाखविलेल्या खेळ भावनेचे कौतुक करावे तेवढे थोडेच.

हि स्पर्धा अक्षरशः निलेशमय झाली, याचे कारण म्हणजे एकेरी विभागात विजेते ठरले श्री निलेश अंतरकर आणि उपविजेते ठरले श्री निलेश केशकामत. तसेच दुहेरी विभागात विजेते ठरले निलेश अंतरकर व योगेश अमृतकर आणि उपविजेते ठरले श्री निलेश केशकामत व श्री आनंद नेवगी. सर्व विजेत्यांचे हार्दिक अभिनंदन.

उपांत्य फेरीपर्यंत दाखल झालेल्या एकेरी विभागातील श्री अजित राजवाडे आणि श्री राजीव दातार, तसेच दुहेरी विभागातील श्री जगदीश जयतापकर व श्री अजय पडवळ आणि श्री राजीव दातार व सौ अनुजा नेवगी यांचेही हार्दिक अभिनंदन.

या स्पर्धेचे, संकल्पनेपासून यशस्वी पुर्णत्वापर्यंतचे संपूर्ण व्यवस्थापन, समितीचे सदस्य श्री निलेश केशकामत आणि सौ प्रेरणा भागवत यांनी केले.

या स्पर्धेला दिलेल्या प्रचंड प्रतिसादाबद्दल आणि स्पर्धा यशस्वीपणे पार पाडण्यात दिलेल्या अमुल्य योगदानाबद्दल सर्वच स्पर्धकांचे हार्दिक अभिनंदन आणि मन:पूर्वक आभार.

महाराष्ट्र मंडळ – अबु धाबी, कार्यकारी समिती २०१४ - २०१५



TABLE TENNIS TOURNAMENT

महाराष्ट्र मंडळ अबुधाबी



नमस्कार मंडळी,

दिनांक ०८ ऑगस्ट २०१४ रोजी 'महाराष्ट्र मंडळ अबु धाबी' ने आयोजित केलेली 'कॅरम' स्पर्धा श्री निलेश केशकामत यांचे निवासस्थानी अतिशय उत्साहात, खेळीमेळीने आणि यशस्वीरीत्या पार पडली. याचे महत्वाचे कारण म्हणजे आपल्या मंडळातील उत्साही आणि प्रतिभावान खेळाडूंनी महिला एकेरी आणि पुरुष एकेरी विभागांत मिळून तब्बल ४८ नोंदण्या करून या स्पर्धेला दिलेला प्रचंड प्रतिसाद.


पुरुष एकेरी विजेते - **श्री जगदीश जयतापकर**

महिला विभागात ०८ आणि पुरुष विभागात ३७ स्पर्धकांनी भाग घेतला. दोनही विभागांत मिळून एकूण ४४ सामने खेळले गेले. प्राथमिक फेऱ्यांमध्ये प्रत्येक सामन्यासाठी Best of Six Boards तर उपांत्य पूर्व आणि उपांत्य फेरीमध्ये Best of Eight Boards चा निकष लावण्यात आला. अंतिम सामना मात्र पूर्ण गुणांचा खेळवण्यात आला. सकाळी ८.४५ पासून स्पर्धेला सुरुवात झाली. प्रथम महिलांचे सामने सुरु झाले आणि नंतर लगेचच पुरुषांचे सामने सुरु झाले. स्पर्धा तब्बल १० तास चालली, म्हणजे सायंकाळी ६.४५ वाजता पुरुष एकेरीचा अंतिम सामना संपला.


पुरुष एकेरी उपविजेते - **श्री आशिष भोळे**

कॅरमच्या या वेळखाऊ स्पर्धेत, एक एक फेरी पार करून पुढे जाणाऱ्या स्पर्धकांचा टिकून राहिलेला उत्साह खरोखर वाखाणण्याजोगाच होता. विशेष कौतुक मात्र करावे लागेल ते उपांत्य आणि अंतिम फेरीपर्यंत पोहोचलेल्या स्पर्धकांचे. या स्पर्धकांनी सकाळी ८.३० पासून हजेरी लाऊन तितक्याच उर्जेने आणि स्पर्धात्मकतेने सर्व सामने खेळले आणि तब्बल १० तास आपला उत्साह टिकवून ठेवला.

अतिशय रंगतदार झालेल्या या स्पर्धेमध्ये आपल्या कुशल खेळाच्या जोरावर महिला एकेरी विभागात विजेत्या ठरल्या **सौ शीतल मालवणकर** आणि उपविजेत्या ठरल्या **सौ पद्मिनी सावंत**. तसेच पुरुष एकेरी विभागात विजेते ठरले **श्री जगदीश जयतापकर** आणि उपविजेते ठरले **श्री आशिष भोळे**. सर्व विजेत्यांचे हार्दिक अभिनंदन.


महिला एकेरी विजेत्या - **सौ शीतल मालवणकर**

उपांत्य फेरीपर्यंत दाखल झालेल्या महिला एकेरी विभागातील **सौ अनुजा पडवळ** आणि **सौ मीनाक्षी कुमार**, तसेच पुरुष एकेरी विभागातील **श्री जगदीश शेनॉय** आणि **श्री मिलिंद चितळे** यांचेही हार्दिक अभिनंदन.

स्पर्धेला लागणाऱ्या वेळेचा अंदाज बांधून, कार्यकारी समितीने उपस्थितांसाठी स्पर्धेच्या ठिकाणीच, समितीच्या वतीने सचिव **सौ प्राची तेलवणे** यांनी बनवलेले **'मिसळ पाव'** विक्रीसाठी ठेवले होते. उपस्थितांनी त्याचा पुरेपूर आस्वाद घेतला. या विक्रीतून जमलेली रक्कम 'महाराष्ट्र मंडळ अबु धाबी' च्या खात्यात जमा होणार आहे.


महिला एकेरी उपविजेत्या - **सौ पद्मिनी सावंत**

या स्पर्धेचे, संकल्पनेपासून यशस्वी पुर्णत्वापर्यंतचे संपूर्ण व्यवस्थापन, समितीचे सदस्य श्री निलेश केशकामत, श्री विनायक कदम आणि सौ प्रेरणा भागवत यांनी केले. या स्पर्धेला दिलेल्या प्रचंड प्रतिसादाबद्दल आणि स्पर्धा यशस्वीपणे पार पाडण्यात दिलेल्या अमुल्य योगदानाबद्दल सर्वच स्पर्धकांचे हार्दिक अभिनंदन आणि मनःपूर्वक आभार.

महाराष्ट्र मंडळ – अबु धाबी, कार्यकारी समिती २०१४ - २०१५